पलोनी लोककथा :

# काचेची राजकन्या


लेखक

पंढरीनाथ रेगे




• मुद्रक :

दत्तात्रय विश्वनाथ पाठक
जगदीश्वर मुद्रणालय, गिरगांव,
गायवाडी, मुंबई क्र. ४

• प्रकाशक :

दत्तात्रय विश्वनाथ पाठक
बा. ल. पाठक प्रकाशन,
९५ मिर्झास्ट्रीट, मोतीबाजार,
मुंबई २.

• आवृत्ती १ ली
पुनर्मुद्रण १९७१

# काचेची राजकन्या

खूप खूप वर्षापूर्वीची गोष्ट. त्या काळी सिलोनमधील एका राजाला होते सात मुलगे. ते सारे राजपुत्र मोठे झाले, तेव्हा त्यांचे सर्वांचे एकदमच लग्न करायचे राजाने ठरवले. ज्या राजाला सात सुंदर राजकन्या असतील त्यांच्याशीं या सातहि राजपुत्रांचे लग्न लावायचे असा बेत राजाने योजला. म्हणून त्याने राजचित्रकाराकडून सातहि राजपुत्रांची रंगीत चित्रे काढून घेतली. एका चतुर दूताकडे ती चित्रे देऊन राजाने त्याला आपली अट सांगितली. तो म्हणाला—

'सात सुंदर राजकन्या असलेला राजा शोधून काढ. त्याला ही चित्रे दाखव. आणि त्या सातहि बहिणींची चित्रे आम्हाला दाखवण्यासाठी घेऊन ये. माझ्या राजपुत्रांना त्यांची

चित्रे पसंत पडली, तर त्या राजकन्यांशी माझ्या मुलांची लग्नं लावण्याची पुढील व्यवस्था करता येईल. '

ती सातहि चित्रे बरोबर घेऊन तो दूत आपल्या कामगिरी-वर निघाला. देशामागून देश त्याने पालथे घातले; पण सात सुंदर उपवर कन्या असलेला राजा काही त्याला आढळता आढळेना. अखेर एका देशाच्या सुवर्णनगरी राजधानीत तो पोचला. ती नगरी अतिशय रम्य होती व एका मोठ्या तला-वाच्या कांठी वसली होती. नगरीच्या मध्यभागी राजाचा राजवाडा होता; तो तर सोन्यारुप्याने मढवलेला;—मन मोहून टाकणारा होता. त्या भव्य राजवाड्यात आपल्या सात रुपवान कन्यांसह त्या देशाचा राजा राहात होता. हवी ती माहिती मिळताच तो दूत त्या राजाच्या भेटीला गेला. आपल्याकडची सातहि राजपुत्रांची चित्रे त्याने राजाला दाखविली आणि मतलब सांगितला. ती सगळी राजाला पसंत पडलीं. आपल्या राजकन्यांना ते साजेसे आहेत हे त्याला पटले. म्हणून मग त्याने आपल्या सातहि कन्यांची चित्रे आपल्या राजचित्रकारा-कडून काढून घेतली आणि ती राजदूताकडे दिली. ती घेऊन तो राजदूत आनंदाने आपल्या राजाकडे परतला.

रुपवान राजकन्यांची ती सातहि चित्रे राजाला तर आवडलीच; पण खुद्द त्या राजपुत्रांनाहि पसंत पडली. मग

काय ? वयाप्रमाणे सातहि राजपुत्रांची लग्ने त्या सात राजकन्यांशी ठरविण्यांत आली. साऱ्यांच्या लग्नासाठी एकच मुहूर्त ठरला. सजवलेल्या सात हत्तींवर बसून राजेशाही थाटाने राजपुत्रांनी लग्नसमारंभासाठी सुवर्णनगरीत जावे असे ठरले.

पण ऐन वेळी सर्वांत धाकट्या तिसा नावाच्या राजपुत्राच्या मनाने काही वेगळेच घेतले. त्याने लग्नाला जायचे नाकारले. तो म्हणाला, ' मी स्वतः नाही येत. माझ्या हत्तीवरून माझी तलवार घेऊन जा. तिच्याशी लग्न करायला माझी ठरलेली वधू तयार झाली, तर तिला तुमच्या बरोबर माझ्या हत्तीवरून आणा. नाहीतर तिला राहूदे आपल्या घरीच. मला तिची पर्वा नाही. '

मग नाईलाजाने तिसाला मागे ठेवून त्याचे इतर सहा भाऊ सुवर्णनगरीला गेले. ठरलेल्या सहा थोरल्या राजकन्याशी त्यांचा थाटामाटाने विवाह झाला. धाकटा राजपुत्र स्वतः आला नाही, एवढेच नव्हे, तर त्याने उलट भलतीच अट घातली. हे पाहून राजकन्यांच्या बापाला खेद वाटला. त्याच्या मनात आले–' माझी सर्वांत धाकटी मुलगी राजमलार तर सर्व बहिणींहून जास्त स्वरूपसुंदर आहे, असं असताना तिच्याशी प्रत्यक्ष लग्न करण्यासाठी राजपुत्र तिसा समक्ष

आला नाही याचा अर्थ काय ? तिचं चित्र त्याला पसंत पडलं नाही की काय ? तसं असेल तर त्याच्या केवळ तलवारीशी राजमलारनं का म्हणून लग्न करावं ? मी नाही तिला तसं करू देणार. राहू दे तिला इथंच माझ्याकडे. ती इतकी रूपवान आहे की तिला सहज कुणीहि दुसरा सुंदर राजपुत्र नवरा म्हणून मिळेल.'

परंतु राजपुत्र तिसा याच्या अटीमागे काहीतरी हेतू असला पाहिजे हे राजमलारने मनातून जाणले होते. त्यामुळे त्याच्या तलवारीशी लग्न करायची आपली इच्छा आहे, असे तिने सांगितले. अर्थात् तिच्या इच्छेबाहेर तिच्या बापाला जाता येईना. शेवटी राजपुत्र तिसा याच्या तलवारीशीच तिचे लग्न लावण्यात आले, आणि आपल्या बहिणीबरोबर तीही सासरी निघाली.

इकडे राजपुत्र तिसा, सर्व मंडळी लग्नसमारंभाहून कधी एकदाची परत येते याकडे डोळे लावून बसला होता. आपली ठरलेली बायको आपल्या तलवारीशी लग्न करून येते की नाही ही उत्कंठा साहजिकच त्याला होती. पण या मंडळीची वाट पहात असतानाच एका रात्रीं अचानक त्याला एक विचित्र स्वप्न पडले. त्यात त्याला कुणीतरी कर्णपिशाच्चाने सांगितले : 'तुझे भाऊ वगैरे मंडळी ज्या मार्गानं परत

येताहेत त्यावर वाटेत मध्येच जंगलांत एक तळं आहे. त्या तळ्याची राखण करणारा एक भुजंग काळसर्प आहे. तुझे तहानलेले भाऊ वगैरे त्या तळ्यांतलं पाणीं पितील आणि मग तो राखणदार भुजंग त्यांच्याकडून एका माणसाची मागणी करील.'

ते स्वप्न पाहून राजपुत्र तिसा अस्वस्थ झाला. भल्या पहाटेच तो उठला आणि स्वप्नात सांगितलेल्या तळ्याच्या शोधार्थ तडक निघाला.. दिवस मावळता मावळता तो त्या तळ्यापाशी जाऊन पोचला. आणि पाहतो–तर खराच एक मोठा भुजंग तळ्याच्या काठी एका झाडाआड स्वस्थ झोपून पडलेला. राजपुत्र तिसा एका दाट झुडपाआड लपून राहिला आणि पुढे काय काय घडतें ते गुपचुप टेहळत राहिला.

तेवढ्यात त्याचे भाऊ आपल्या बायकांसह तेथे आले. दिवसभराच्या प्रवासाच्या श्रमाने त्यांना खूप तहान लागलेली होती. सर्वांत थोरल्या राजपुत्राने तर हत्तीवरून लगेच खाली उडी घेतली. धावतच तळे गाठले. तळ्याचे पाणी स्फटिका-सारखे स्वच्छ–निर्मळ होते. ते पाहून ओंजळी भरभरून तो घटाघटा पाणी प्याला. त्याच्या पाठोपाठ इतर सर्वजणांनी आपली तहान भागवली. पण त्यांचे तहानलेले जीव शांत

झाले नाहीत, तोच तो राखणदार भुजंग झोपेतून उठला आणि सरपटत सरासर पुढे सरसावला. कांही क्षणांतच त्याने थोरल्या राजपुत्राला गाठले; आणि उंच फणा उभारून सुनावले—

'माझ्या तळ्यातलं पाणी तुम्हीं माझ्या परवानगीशिवाय प्यायलांत. आता त्याचं मोल देणं तुम्हाला भाग आहे. तुमच्यापैकी एका माणसाला तुम्ही माझ्या स्वाधीन केलं पाहिजे. तरच तुम्हा बाकीच्या मंडळीला इथून सुखरूप जाता येईल. नाहीतर तुम्हा सर्वांनाच मी ठार मारीन.'



सर्वजण भयभीत झाले. आता या आपत्तीतून मार्ग कसा काढावा याबद्दल सहाही राजपुत्र आपापसात चर्चा करू लागले. भुजंगाच्या स्वाधीन व्हायला आपण होऊन कुणीच तयार होईना. सारेजण आपआपसात भांडू लागले. प्रथम थोरला राजपुत्र पाणी प्यायला. तेव्हां त्यानेंच भुजंगाच्या स्वाधीन होऊन बाकीच्यांची सुटका करावी असे इतर भाऊ म्हणू लागले. पण तो म्हणाला—मी सर्वांत थोरला मानाचा राजपुत्र. तेव्हां राजा वारल्यावर पहिला वारस म्हणून मलाच राज्याच्या गादीवर बसावं लागेल. अर्थात मला परत गेलंच पाहिजे.'

त्यांचे चाललेले भांडण पाहून अखेर राजकन्या राजमलार पुढे सरसावून शांतपणे म्हणाली—'मला वाटतं...मीच या भुजंगाच्या स्वाधीन होणं बरं. एवीतेवी मी तुमच्या धाकट्या भावाच्या तलवारीशीच केवळ लग्न केलं आहे. मी तुमच्याबरोबर परत गेले नाही, तर चालण्यासारखं आहे. त्याच्या तलवारीशीच लग्न करण्यास मी नकार दिला असं तुम्हाला त्याला सांगतां येईल.'

राजमलारसारख्या रूपवान तरुणीला त्या भुजंगाच्या स्वाधीन करणं साऱ्यांच्या जिवावर आले. परंतु दुसरं कुणीच आपण होऊन तयार होईना. तेव्हां मग नाइलाजानें

मन घट्ट करून तिलाच भुजंगाच्या स्वाधीन करण्याचे सर्वांनी ठरविले.

एवढावेळ हा सारा प्रकार झुडूपांआड लपून पहात असलेला राजपुत्र तिसा आता झटकन पुढे सरसावला. आपल्या भावांना धीर गंभीर पणे म्हणाला–' तुम्ही सर्वजण सातहि राजकन्यांसह खुशाल घरी जा. मी होतो भुजंगाच्या स्वाधीन.'

आपली बायको राजमलार हिच्याकडे पाहण्याचा धीर मात्र राजपुत्र तिसाला झाला नाही. तिने आताच दाखविलेल्या त्यागाच्या वृत्तीने तो भारावून गेला होता. अशा धीरवान व त्यागी सुंदर तरुणीला आपल्या तलवारीशी लग्न करण्यास आपण भाग पाडले याबद्दल त्याला आता खंत वाटत होती. शिवाय भुजंगाच्या तावडीतून आपण सुटून पुन्हा तिचे दर्शन आपणाला होईल की नाही कुणास ठाऊक, असेहि त्याला वाटत होते. भुजंगाच्या तावडीतून यावेळी तिची सुटका आपल्या हातून होत आहे एवढे तरी समाधान त्यातल्या त्यात त्याला वाटले.

सर्व राजपुत्र व राजकन्या यांना तिसाबद्दल खूप वाईट वाटले. राजकन्या राजमलारला तर आपले दुःख सोसवेना. सर्वांनी भुजंगाला विनवून सांगितले–' या वेळेपुरती आम्हाला क्षमा कर. आम्हा सर्वांना सुखरूप घरी परत जाऊ दे. तुझे

उपकार आम्ही विसरणार नाही.' परंतु भुजंगाने आपला हट्ट सोडला नाही.

शेवटी त्या सात राजकन्या व सहा राजपुत्र दुःखी मनाने, निरुपायाने तिसाला भुजंगाच्या स्वाधीन करून, आपल्या मार्गाला लागले.

ती सर्व मंडळी निघून जाताच भुजंग राजपुत्र तिसाला म्हणाला, 'हे पहा, मीं आजारी आहे. माझ्या डोक्यात कळा मारतात आणि मला खूप वेदना होतात. माझं हे दुःख तू दूर केलंस तर तुला मी सुखरूप तुझ्या घरी परत जाऊं देईन.'

ते ऐकून तिसाने त्याचे दुखणे बरे करायचा प्रयत्न चालविला. रानातल्या वनौषधी मिळवून त्यांचा रस तो भुजंगाच्या माथ्यावर लावू लागला. पण या सर्वांचा काहीहि उपयोग होईना. दुखणें काही बरे होईना. शेवटी भुजंग त्याला म्हणाला,

'यावर एक खात्रीचा उपाय आहे. या जंगला बाहेर एक नगरी आहे. तिथं एक राजकन्या राहते. काचेची राजकन्या म्हणतात तिला. तिच्यापाशी खूप गुणकारी औषधं आहेत. तिच्याकडे असं एक जादूचं मलम आहे की, ते लावलं की माझं दुखणं बरं होईल. ते तू मिळवून आण.'

राजपुत्र तिसा लगेच त्या ' नगरीच्या आणि काचेच्या राजकन्येच्या शोधासाठी निघाला. जंगल पार करीपर्यंतच

त्याला संध्याकाळ झाली. तोवर तो एका नदीपाशी येऊन पोचला होता. नदीच्या प्रवाहात कांही उंदीर पोहत पलीकडल्या काठाला जायला धडपडत होते. परंतु नदीतील पाण्याच्या प्रवाहाला उलट्या दिशेने जोर होता. त्यामुळे त्यांची धडपड वांया जात होती. पलीकडचा कांठ गांठण्यापूर्वीच ते बुडून मरतील असे चिन्ह दिसत होते. राजपुत्र तिसा दयाळू मनाचा होता. त्याला त्या उंदरांची कीव आली. तो नदीत पोहत गेला आणि त्याने त्या उंदरांना आपल्या अंगाखांद्यावर घेतले. मग तो तसाच पुढें पोहत गेला व त्याने त्यांना पलीकडल्या तीरावर सुखरूप नेऊन सोडले.

त्याने आपला जीव वाचवला आणि आपल्याला हवे तिथें



नेऊन पोचवले म्हणून त्या उंदरांनी त्याचे आभार मानले. त्याच्या उपकाराबद्दल कृतज्ञता दाखवून त्याला ते म्हणाले, ' तुला कधी आमची गरज लागली, तर आमची आठवण करून आम्हाला हाक मार, मग आम्ही तुझ्या मदतीला लगेच धावून येऊ. '

राजपुत्र तिसा आपल्या पुढल्या मार्गाला लागला. अखेर रात्र होईपर्यंत काचेच्या राजकन्येची नगरी त्याने गाठली. रात्र झाल्याने पुढले काम काहीं करता येण्यासारखे नव्हते. म्हणून नगरीच्या वेशीवरच असलेल्या एका म्हातारीच्या घरी त्याने रात्रीचा मुक्काम केला. रात्री जेवल्यावर त्या काचेच्या राजकन्येची माहिती तिसाने म्हतारीला विचारली. ' राजकन्येची भेट मला कशी घेता येईल ? ' असे त्याने विचारलें.

म्हातारी म्हणाली ' बेटा, तिची भेट घेणं तुला शक्य होईलसं दिसत नाहीं. तिच्या बापाला—खुद्द राजाला तिच्या सुंदर रुपाचा अतिशय हेवा वाटतो. त्यामुळं, त्यानं घातलेल्या दोन अटी पूर्ण केल्याशिवाय तो कुणाला तिची भेटसुद्धां घेऊ देत नाही. आणि त्या अटी पूर्ण करणं तर महाकठीण कर्म आहे. अशक्यच म्हणेनास ! पहिली अट अशी की, उकळत्या पाण्याच्या टाकीत त्या माणसानं बुडी घेऊन दाखवायची.

आता एवढं करून तो जिवंत राहिलाच समज; तर त्यानं दुसरी कठीण अट पुरी करायची. ती म्हणजे–लोखंडाचं मोठालं झाड त्यानं तोडून दाखवायचं. ह्या दोन्ही अटी पुऱ्या करता आल्या नाहींत, तर राजाचे सैनिक त्याला बेधडक ठार मारतात. या अवघड अटी जो पूर्ण करील त्याचं त्या राजन्येशी लग्न लावून दिलं जाईल.'

'पण माझं लग्न आधीच झालं आहे. माझी बायको गुणी आणि रूपवान आहे. अर्थात या राजकन्येशी काही मला लग्न करायचं नाही. एका कामासाठी मला तिची जराशी भेट घ्यायची आहे एवढंच.' तिसाने खुलासा केला.

म्हातारी म्हणाली–' काही का असेना, राजा काही तुला तिची भेट घेऊ देणार नाही. '

'पण तिला काचेची राजकन्या का म्हणतात ? ' राजपुत्र तिसाने विचारले.

'कारण, पूर्णपणे काचेच्या बनवलेल्या महालात ती रहाते. ' म्हातारीने खुलासा केला. ' तिच्या त्या महालाला दारं किंवा खिडक्या काहीहि नाहीत. तिला अवगत असलेल्या जादूच्या शक्तीमुळं आत–बाहेर जाते–येते.

ही हकीगत ऐकून तिसा चिंतेत पडला. ते पाहून म्हातारीने विचारले–' तुझं असं काम तरी काय आहे तिच्याशी. माझी काही मदत होऊ शकेल का ?'

राजपुत्राने तिला आपली सारी हकीगत सांगितली. मग तो म्हणाला–' तिच्याकडचं जादूचं मलम मला मिळालं तरच त्या भुजंगाचं दुखणं मला बरं करता येईल आणि माझी सुटका होईल.'

म्हातारीहि काळजीत पडली. मग काहीतरी आठवण झाली तशी ती म्हणाली–' हे बघ बेटा, मी असं ऐकलंय की, तीन दिवस या राजकन्येच्या जेवणातला थोडातरी हिस्सा जो कुणी खाईल त्याची मागणी ती पुरी करील. तिच्या अन्नात वाटेकरी होणाऱ्याला ती नकार देऊ शकत नाही. ही गोष्ट कशी काय साधता येईल ते पाहायला हवं. पण आपण त्याबद्दल उद्या सकाळी काय तो विचार करूं या. लांबचा प्रवास करून तू थकलाभागला आहेस. आता तू स्वस्थ झोप घे. उद्या आपल्याला यातनं काय मार्ग काढता येतो ते पाहू.'

मग राजपुत्र तिसा झोपी गेला. पण काळजीमुळं त्याला स्वस्थ झोप कुठली लागते ? काचेच्या राजकन्येची भेट कशी घेता येईल याचाच विचार तो रात्रभर करीत राहिला. आणि पहाटे पहाटे त्याला नदीत सापडलेल्या त्या उंदरांची अचानक आठवण झाली. त्याबरोबर तो एकदम उठून बसला आणि उंदरांना उद्देशून कळकळीने म्हणाला–' हे उंदरांनो, मला गरज लागली की धावून यायचं वचन दिलं होतंत तुम्ही मला. आता या संकटात मदत कराल का मला ? '

आणि काय आश्चर्य ! शेकडो उंदरांची पलटणच्या पलटण तत्काल त्या खोलीत तुरुतुरु धावत आली. त्यांचा म्होरक्या उंदीर तिसाला म्हणाला–' का काढलीस आमची आठवण ? हे पहा आलो आम्ही हाकेसरशी. काय काम आम्ही तुझ्यासाठी करू ? सांग ! लगेच कामाला लागतो. '

' तुम्ही आलात हे पाहून मला धीर आला. ' राजपुत्र म्हणाला. ' आता असं करा—इथून जमिनीखालून एक भुयार पाडा. या नगरीतल्या राजवाड्यात काचेची राजकन्या राहते. तिच्या काचेच्या महालाच्या तळापर्यंत ही चोरवाट

पोचायला हवी. मात्र ह्या चोरवाटेचं पलीकडलं तोंड तिच्या पलंगाच्या खाली उघडलं पाहिजे. कारण ते तिच्या दृष्टीस पडता नये.

त्याची इच्छा कानीं पडल्याबरोबर उंदरांच्या सेनेने लगेच खोदकामाला सुरवात केली. आणि दिवस मावळेपर्यंत त्याला हवी तशी भुयारी चोरवाट त्यानी सपासप तयार केली.

मग काय? तिसाने पुढचा बेत ठरविला आणि तो आपल्या कामगिरीला लागला. मध्यरात्र झाली तशी त्यानें त्या भुयारातून सरपटत सरपटत जाऊन राजकन्येच्या महालात गुपचूप प्रवेश केला. राजकन्या पलंगावर स्वस्थ झोपली होती. पलंगाखालून तो हळूच बाहेर आला. पहातो तर पलंगा शेजारच्या मेजावर एका वाडग्यात भात व एका सुरईत दूध झाकून ठेवलेले. बाजूला हात धुण्यासाठी पाणी, साबण व टॉवेलहि होता. तिसाने आवाज होऊ न देता प्रथम हलकेच हात धुतले. वाडग्यातला अर्धा भात खाल्ला, आणि सुरईतले अर्धे दूध पिऊन टाकले. मग पुन्हा स्वच्छ हात धुवून

तो गुपचूप भुयारात परत शिरला. भुयाराचे तोंड वरून उघडे दिसू नये म्हणून मातीने त्याचे तोंड त्याने झाकून टाकले; आणि तो म्हातारीच्या घरी माघारी परतला.

काचेची राजकन्या सकाळी उठून पहाते, तर मेजावरील भात व दूध अर्धे कुणीतरी फस्त केलेले. तिला मोठे आश्चर्य वाटले. आपल्यासारख्याच कुणीतरी चतुर माणसाने रात्री महालांत शिरून हे गुपचुप उरकलेले असावे हे तिने ताडले. ती मनात म्हणाली-‘ त्या माणसालाहि या बंद महालात येण्याची जादू येत असली पाहिजे. पण आज रात्री ते माणूस परत आले तर चोरट्याला मी पाळत ठेवून पकडीन.’

आणि त्या रात्री ती जागत वाट पहात राहिली. पण मध्यरात्र होत आली तशी तिला काही झोप आवरेना. अखेर ती पलंगावर पडून झोपी गेली.

तिसा मध्यरात्रीनंतर लगेच भुयारातून हळूच बाहेर पडला. त्याने चाहूल घेतली, तर राजकन्या घोरत पडलेली. आधल्या रात्रीप्रमाणे त्याने अर्धा भात व दूध हलकेच मटकावले आणि तो गुपचूप भुयारात परत शिरला.

तिसऱ्या रात्री मात्र राजकन्येने जागे राहण्याचा पक्का निश्चय केला. झोप येऊ नये म्हणून तिने आपल्या हाताच्या एका बोटाला चाकूने बारीकशी चीर पाडली. एवढेच नव्हे, तर त्या जखमेवर मिठाची पूड चोळली. जखम झोंबत राहावी व त्यामुळे झोप लागू नये म्हणून तिने ही युक्ती योजली होती. अर्थात त्या मध्यरात्री तिसा भुयारातून बाहेर आला, तेव्हा खरे तर ती जागीच होती, परंतु गुपचूप आपल्या महालात शिरणारे धाडशी माणूस कोण असावे हे पाहण्याचे तिला कुतूहल होते. म्हणून आपण नेहमीप्रमाणे झोपलो आहोत या समजुतीने त्याने आत शिरावे या इराद्याने तिने झोपेचे सोंग घेतलें, आणि ती पलंगावर खोटेच घोरत पडली. ती गाढ झोपलेली आहे या समजुतीने तिसा पहिल्यासारखा भुयाराबाहेर आला आणि त्याने आधल्या दोन खेपांप्रमाणे भात व दूध यांचा समाचार घेतला. त्याने हात धुतल्याबरोबर मात्र तिने चटकन् त्याला प्रश्न केला—

'कोण आहेस तू ? आणि अशा मध्यरात्रीच्या वेळी माझ्या खोलीत शिरण्याचं धाडस तुला कसं झालं ?'

ती जागी असल्याचे पाहून तिसा प्रथम दचकला. पण

आज तिसऱ्यांदा तिच्या अन्नातला वाटा तर आपण खाल्लेला आहे. त्यामुळे आता घाबरण्याचें कारण नाहीं. आपली कामगिरी होऊ शकेल. या विचारानें त्याला धीर आला; आणि त्याने आपण कसे संकटांत सांपडलो आहोत ही हकीगत तिला सांगितली. भुयाराची युक्ती कशी लढवली हेहि सांगितले. त्या आपत्तीतून सुटण्यासाठीं, भुजंगाचे दुखणे बरे करू शकणारे मलम देण्याची विनंती मग तिला त्यानें केली.

राजकन्येला त्याच्या धाडसाचे कौतुक वाटले. त्याच्यावरील संकटाबद्दलहि सहानुभूती वाटली. शिवाय त्याने सतत तीन दिवस तिच्या अन्नातील वाटा खाल्लेला होता. त्यामुळे त्याच्या मागणीला तिला नकार देता येत नव्हता. त्याची चतुराई पाहून ती मनापासून हसली आणि त्याला हवे ते जादूचे मलम तिने आनंदाने देऊन टाकले. मग ती म्हणाली—

‘ तुझ्यासारखा चतुर नि धाडशी तरुण नवरा मिळावा हे खरोखरीच तुझ्या बायकोचे सुदैव म्हटले पाहिजे. मलाहि कधीतरी तुझ्यासारखा नवरा मिळेल अशी मी आशा करते. ’

तिचे आभार मानून राजपुत्र तिसा आनंदाने भुयारातून म्हातारीच्या घरी परतला. आपल्याला हवे होते ते मलम मिळाले असे तिला त्याने खुषीने सांगितले. मग आपल्याला आसरा दिल्याबद्दल त्याने त्या दयाळू म्हातारीला देणगीदाखल खूप पैसे दिले, आणि तो भुजंगाच्या तळ्याकडे झपाट्यानें निघाला.

तळ्याशी तिसा जाऊन पोचला, तेव्हा रात्र होती तरी चांदणे पडलेले होते. भुजंगहि जागाच होता. आणलेले जादूचे मलम तिसाने भुजंगाच्या माथ्यावरच्या दुखऱ्या भागावर लावले आणि अपेक्षेप्रमाणे त्याचे दुखणे लगेच बंद झाले. साहजिकच भुजंगाला संतोष झाला आणि तो आनंदाने तिसाला म्हणाला—

‘ छान ! फारच चांगली कामगिरी बजावलीस तू. आता तू खुशाल घरी परत जा. पण मला आधी हे सांग–काचेच्या राजकन्येच्या महालात प्रवेश मिळवायची कोणती युक्ती तू शोधून काढलीस ? ’

भुयाराची गोष्ट तिसाने सांगताच भुजंगाला हसू आले.

तो म्हणाला– ‘ तुझ्या चतुराईचं नि धाडसाचं बक्षीस तुला मिळालं आहे. आता घरीं जाऊन तुझ्या बायकोबरोबर आनंदानं संसार कर. तुझी पत्नी राजमलार हिनंसुद्धा आपल्या मनाचा मोठेपणा परवा इथंच दाखवून दिला आहे. दोघंहि सुखानं नांदाल याबद्दल मला बिलकूल शंका नाहीं. ’

राजपुत्र तिसा राजवाड्यात सुखरूप परतलेला पाहताच सर्वत्र आनंदी आनंद झाला. राजकन्या राजमलार हिच्या खुषीला तर सीमाच नव्हती. लग्नापासून नाना अडचणी आणि संकटे येऊनहि शेवटी आपला नवरा आपल्याला मिळाला हे पाहून तिला केवढे समाधान झाले याचे वर्णन काय करावे ? आता तर दोघांचीहि मने जुळली होती. दोघेहि सुखासमाधानाने नांदतील ही भुजंगाची इच्छा खरी ठरली.

भुजंगाच्या तावडीतून आपली सुटका आपण कशी करून घेतली याची हकीगत तिसाच्या तोंडून ऐकली तेव्हां सर्वांना त्याच्या धाडसाचे व चतुराईचे खूप कौतुक वाटले. प्रथम राजकन्या राजमलार हिने व मग तिसाने दाखवलेल्या त्यागी वृत्तीने इतर राजपुत्रबंधू त्यांचे ऋणी झालेच होते. आता त्या दोघांचे मीलन झाले हे पाहून त्या सर्वांच्या मना-

ारचा भार हलका झाला होता. तिसा व राजमलार या ोघावरहि सर्वांचेच आता विशेष प्रेम जडले होते.

ज्या तलवारीशी प्रथम आपण जाणूनबुजून लग्न केले, त्या ालवारीच्या मालकाने आपले शौर्य व धाडस विलक्षण प्रकारे सिद्ध केले याचा केवढा अभिमान राजमलारला ाटला !

